**न्युक्लिअस बजेट अंतर्गत पारधी व कातकरी समाजासाठी पॅकेज तयार करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.न्युबयो- २०२५/प्र.क्र.३४ /का-१४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक:- १७ एप्रिल,२०२५**

**वाचा: -**

१. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.पारधी-२००८/प्र.क्र.३७/का-१७, दि.१४/१०/२००८
२. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.न्युबयो-२०११/प्र.क्र.८७/का-०७, दि.२१/०६/२०१३

**प्रस्तावना :-**

सन २०२५-२६ च्या जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रमाच्या नियोजनाबाबत घेण्यात आलेल्या राज्यस्तरीय बैठकीमंध्ये मा.मंत्री आदिवासी विकास यांनी कातकरी समाज व पारधी समाजासाठी विशेष पॅकेज सुरु करण्याची आवश्यकता असल्याची बाब नमूद केली होती.

वाचा मधील अनु.क्र. १ मधील शासन निर्णयान्वये आदिवासी घटक कार्यक्रमाखाली पारधी समाजासाठी पारधी पॅकेज अंतर्गत विविध योजना राबविण्यात येत आहेत. सदर शासन निर्णय निर्गमित होऊन जवळपास १६ वर्षांचा कालावधी उलटून गेला असल्याने सदर शासन निर्णयान्वये पारधी पॅकेज अंतर्गत येणाऱ्या योजनांमध्ये कालानुरुप व परिस्थितीनुरुप बदल करणे आवश्यक आहे.

आदिवासी विकास विभागाद्वारा आदिम जमाती विकास कार्यक्रम राबविण्यात येतो. यामध्ये कातकरी,कोलाम व माडिया या जमांतींसाठी विकासाच्या योजना राबविण्यात येतात. यामध्ये कातकरी समाजासाठी आवश्यक तेवढा लाभ मिळत नााही. यासाठी कातकरी समाजासाठी स्वतंत्रपणे पॅकेज स्वरुपाच्या योजना राबविण्याची बाब मा.मंत्री,आदिवासी विकास विभाग यांनी नमूद केली होती.

वाचा मधील अनु.क्र.२ मधील शासन निर्णयान्वये न्युक्लिअस बजेट योजना राबविण्यात येत आहे. सदर योजनेतंर्गत आदिवासी व्यक्ती/कुटुंबास किंवा २ किंवा त्यापेक्षा अधिक लाभार्थी एकत्र आले तर सामुहिक प्रकल्प/कार्यक्रम मंजूर करण्यात येऊन त्या प्रमाणात अर्थसहाय्य करण्यात येते. त्याच धर्तीवर पारधी व कातकरी समाजातील लाभार्थ्यांसाठी स्थानिक पातळीवर त्या समाजाच्या गरजेनुसार/मागणीनुसार वैयक्तिक/सामुहिक स्तरावर योजनांचा लाभ देण्याची कार्यवाही करणे उचित राहील.

पारधी समाज हा एका जागी स्थित न राहता रोजगारासाठी स्थलांतर करत असतो. त्यानुषंगाने पारधी समाजाच्या लाभार्थ्यांना स्थैर्य तसेच त्यांचे जीवनमान उंचावण्यासाठी सदर योजनांमध्ये परिस्थितीनुरूप बदल करणे आवश्यक आहे. यासाठी पारधी समाज बहूल लोकसंख्या असलेल्या सोलापूर व यवतमाळ तसेच कातकरी बहुल लोकसंख्या असलेल्या अनुक्रमे रायगड व पालघर या जिल्ह्यांकडून या समाजाच्या स्थानिक गरजा/मागणी यांचा विचार करून त्यांच्या आवश्यकतेनुसार योजनांचा लाभ देण्याच्या अनुषंगाने आराखडा तयार करण्यासाठी संबधित जिल्हांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

पारधी व कातकरी समाजाच्या स्थानिक गरजा/मागणी यांचा विचार करून त्यांच्या आवश्यकतेनुसार योजनांचा लाभ देण्याच्या अनुषंगाने आराखडा तयार करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

**सोलापूर व यवतमाळ या जिल्ह्यांसाठी पुढीलप्रमाणे स्वतंत्रपणे प्रत्येकी १ समिती राहील.**

| **पारधी पॅकेज समिती** | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **समिती सदस्य** | **समितीमधील स्थान** |
| १ | मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २ | प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | सदस्य |
| ३ | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी नाम निर्देशित करावे) | सदस्य |
| ४ | सहाय्क प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, | सदस्य सचिव |

**रायगड व पालघर या जिल्ह्यांसाठी पुढीलप्रमाणे स्वतंत्रपणे प्रत्येकी १ समिती राहील.**

| **कातकरी पॅकेज समिती** | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **समिती सदस्य** | **समितीमधील स्थान** |
| १ | मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २ | प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ३ | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांनी नाम निर्देशित करावे) | सदस्य |
| ४ | सहाय्क प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | सदस्य सचिव |

(ज्या जिल्ह्यांमध्ये एकापेक्षा अधिक प्रकल्प कार्यालय आहेत,त्या जिल्ह्यांमध्ये समितीच्या सदस्य-सचिव याबाबत समिती अध्यक्षांनी निर्णय घ्यावा.)

**समितीची कार्यकक्षा**

१) न्युक्लिअस बजेट अंतर्गत प्रस्तावित पॅकेज विचाराधिन असल्याने उपरोक्त समितीने न्युक्लिअस बजेट अंतर्गत योजनेच्या तरतूदींच्या अधिन राहुन या समाजाच्या स्थानिक गरजा/मागणी विचारात घेऊन योजनांचे पॅकेज प्रस्तावित करावे.

२) योजना प्रस्तावित करतांना स्थानिक निकड,आवश्यकता,उपलब्ध स्त्रोत/साधन सामुग्री यांचा विचार करण्यात यावा.

३) उक्त समितीने सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १ आठवड्यात शासनास अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०२५०४१७१२५९४०५७२४ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH VITHALRAO KOVE

Digitally signed by SATISH VITHALRAO KOVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CE18732734BA0742D7712775E8F0AD400558E8748375399762FD447C3E9AC1EB, cn=SATISH VITHALRAO KOVE
Date: 2025.04.17 13:00:52 +05'30'

**( सतीश वि.कोवे )**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,मलबार हिल,मुंबई.
२. मा.सभापती,महाराष्ट्र विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष,महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
७. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई

८. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
९. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
१०.मा.राज्यमंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
११.सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
१२.सर्व विधानसभा / विधान परिषद सदस्य
१३.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४.सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.सर्व विभागीय आयुक्त,महसूल विभाग सर्व
१६.आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
१७.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१८. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१९.आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
२०. जिल्हाधिकारी, रायगड,पालघर,सोलापूर व यवतमाळ
२१.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.नाशिक
२२.व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त विकास महामंडळ, नाशिक
२३.अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर, अमरावती
२४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड,पालघर,सोलापूर व यवतमाळ
२५. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,पेण,जव्हार,डहाणू, सोलापूर,पुसद व पाढंकवडा
२६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२७.जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
२८.सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
२९.महासंचालक माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई.
३०.निवड नस्ती.(का.१४) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.